# हॅरियेट टबमन

## आणि भुयारी रेल्वे

लेखकः डॅन अॅबनेट

मराठी अनुवादः सुशील मेन्सन



# हॅरियेट टबमन आणि भुयारी रेल्वे

प्रमुख पात्रे

हॅरियेट टबमन (1822-1913) चा जन्म एका गुलामाघरी झाला. वयाच्या सत्तावीसाव्या वर्षी तिने पलायन केले. तिने सुमारे 300 गुलामांना अमेरिकेच्या दक्षिण भागातून उत्तर भागात पलायन करण्यास मदत केली. नंतर तिने गृहयुद्धात केंद्रीय लष्करासाठी काम केले. हॅरियेट टबमनने स्त्रियांच्या तसेच गरीबांच्या हक्कांसाठीही लढा दिला.

विल्यम स्टील (1821-1902) याचे आईवडील पूर्वाश्रमीचे गुलाम होते. त्याला *भुयारी रेल्वेचा जनक* म्हणतात. त्याने प्रत्येक महिन्यात 60 गुलामांना पलायन करण्यास व मुक्त होण्यास मदत केली. यांतील प्रत्येक गुलामाची त्याने काळजीपूर्वक नोंद ठेवली. त्याच्या नोंदीनुसार, त्याने भुयारी रेल्वेतून 649 गुलामांना पलायन करण्यास मदत केली.

थॉमस गॅरेट (1789-1871) गुलामगिरी प्रथेचे कडवे विरोधक होते. त्यांनी *डेलावेर* राज्यात भुयारी रेल्वेसाठी काम केले. गॅरेट यांनी गुलामांना मुक्त करण्यासाठी अनेकदा टबमनसोबत काम केले. त्यांच्या म्हणण्यानुसार, त्यांनी 2,500 गुलामांना मुक्त होण्यात मदत केली.

# हॅरियेट टबमन आणि भुयारी रेल्वे

अठराव्या आणि एकोणीसाव्या शतकात, अमेरिकेच्या दक्षिण भागात गुलामगिरी प्रथा प्रचलित होती.

काळे लोक गुलाम असत. त्यांना आफ्रिकेतून पकडून अमेरिकेत आणत आणि तिथे त्यांची विक्री करत.

बहुतांशी गुलाम मोठमोठ्या शेतांवर काम करत. गुलाम हे त्यांच्या मालकांची मालमत्ता असत.

गुलामांची मुले शाळेत जात नसत. फार लहान वयातच त्यांना कठोर मेहनतीची कामे करावी लागत.

*अरामिंटा रॉस* ही 1822 साली, मेरिलँड राज्यात गुलाम म्हणून जन्मली. सहा वर्षांची असताना ती एका विणकराकडे काम करू लागली.



लोक अरामिंटाशी फार वाईट वागत असत.

एकदा अरामिंटाला गोवर झाला.



त्यातून बरी झाल्यावर ती मोलकरीण आणि आया म्हणून काम करू लागली.









त्या गुलामाने कसेतरी स्वतःला सोडवून घेतले आणि तो पळू लागला. सुपरवायझरने त्याला एक लोखंडी वजन फेकून मारले. पण चुकून ते हॅरियेटला लागले. तिला जबरी इजा झाली.




1844 च्या सुमारास, हॅरियेटने *जॉन टबमन*शी लग्न केले. तो गुलाम नव्हता.


कधीतरी आपण उत्तर भागात जाऊ. तिथे गुलामगिरी नाही. आपण सगळे मुक्त असू.
मी अगोदरच मुक्त आहे. मी इथेच खुश आहे.


काही गुलाम पळून गेलेयत. मी सुद्धा पळून जाईन.
कुठे जाणार तू, हॅरियेट?


1849 मध्ये, हॅरियेट टबमनचे मालक, *एडवर्ड ब्रोडेस*चे निधन झाले. त्यानंतर, श्रीमती ब्रोडेसवर कर्जाचा बोजा आला.
श्रीमती ब्रोडेसला हे कर्ज चुकवण्यासाठी आपले गुलाम विकावे लागले..


तेव्हाच टबमनने पळून जायचा विचार केला.
ती एका व्यक्तिच्या घरी गेली. तिच्याकडून तिला मदत मिळू शकत होती.


तुम्ही गुलामांची मदत का करता?
गुलामगिरी प्रथा चुकीची आहे. मनुष्याने मनुष्याचा मालक होऊ नये, त्याच्याशी गैरवर्तन करू नये.


टबमनने गुपचुप मेरीलँड सोडले. कुणाला दिसू नये म्हणून, ती एका घोडागाडीत पोत्यांच्या खाली लपून बसली.


आम्ही गुलामगिरी प्रथेच्या विरुद्ध आहोत. आम्ही तुम्हाला मदत करू.
तुमच्या मदतीसाठी आभार, महोदय.


आम्ही तुम्हाला फिलाडेल्फियाला घेऊन जाऊ. तिथे तुम्ही एक स्वतंत्र व्यक्ती म्हणून राहू शकता.


अखेरीस, हॅरियेट टबमन मुक्त झाली. इतर गुलामांना मुक्त करण्यासाठी पैशांची गरज होती. त्यासाठी तिने कठोर मेहनत केली.


टबमन फिलाडेल्फियात *विल्यम स्टील*लाही भेटली. स्टीलने गुलामांना पलायन करण्यात मदत केली होती.


स्टीलने तिला एका गुलामाची गोष्ट सांगितली. त्याला त्यांनी नुकतीच मदत केली होती.
*हेन्री ब्राऊन* मुक्त होण्यासाठी काहीही करायला तयार होता, हॅरियेट. त्याने स्वतःला एका लाकडी पेटीत बंद करून पेटी पोस्टाने मला पाठवली.


हेन्रीची कहाणी ऐकून माझ्या आशा पल्लवित झाल्यायत.


हॅरियेट, आमची इच्छा आहे की तुम्ही भुयारी रेल्वेची कंडक्टर बनावं.




स्टिलने तिला समजावलं की गुलामांना पळून जायला मदत करणे, हे सोपे काम नाही. एक नवा कायदा, “पलायन करणारे गुलाम, अधिनियम,” नुसार गुलामांना देशात कुठेही पकडू शकत असत आणि त्यांना आपल्या मालकाकडे पुन्हा पाठवता येत असे.



टबमन घाबरली नाही. तिने भुयारी रेल्वेच्या मार्गांची माहिती घेतली. तिने मौन राखण्याची शपथ घेतली.



1850 साली, टबमनला कळलं की तिची पुतणी आणि तिच्या दोन मुलांना मेरीलँडच्या केंब्रिज शहरात विकणार होते.

हॅरियेट मुक्त आहे. ती नक्कीच मदत करेल आपल्याला. घाबरू नका.

टबमन आपल्या कुटुंबाच्या सुटकेसाठी मदत करायला धावली.

कुटुंबियांनी पेनसिल्व्हेनियातून प्रवास केला. यादरम्यान ते अनेक सुरक्षित घरांमध्ये थांबले.




रात्री प्रवास करताना आणि गर्दीपासून दूर असताना गुलाम जास्त सुरक्षित असत.





आपल्या पहिल्या य़शस्वी मोहिमेनंतर, हॅरियेट टबमनने गुलामांच्या मुक्ततेसाठी आपले दक्षिण भागाचे दौरे सुरू ठेवले.



हा प्रवास खूप कठीण असे. गुलाम पकडले जाऊ शकत, ठार मारले जाऊ शकत.



गुलाम दक्षिण भागातून पलायन करू लागले.

आपण नदी पार करू आणि डेलावेरमध्ये थॉमस गॅरेटच्या घरी जाऊ. त्यांनी गुलामांना मुक्त करण्यासाठी सर्वात जास्त मदत केलीय.




एव्हाना, फिलाडेल्फिया ही पळून येणाऱ्या गुलामांसाठी सुरक्षित जागा राहिली नव्हती. म्हणून, टबमन कॅनडातील *सेंट कॅथरीन* शहरात गेली. तिथे तिला कुणी पकडू शकत नव्हते, परत दक्षिण भागात पाठवू शकत नव्हते.

....भुयारी रेल्वे मार्ग

भुयारी रेल्वे बहुसंख्य गुलामांना कॅनडाला नेऊ लागली. काही गुलाम मेक्सिकोला गेले.

न्यूयॉर्क ते कॅनडा या मार्गावर नायगरा धबधब्याजवळ गुलामांना एक धोकादायक पूल पार करावा लागत असे.


1851 मध्ये हॅरियेट टबमन मेरीलँडला परतली.


तू इथे काय करतेयस?
तू माझा नवरा आहेस, जॉन. मी तुला घरी परत नेण्यासाठी आलेय.


हेच माझं घर आहे, हॅरियेट. मी तुझ्यासोबत येणार नाही.


मी नवी पत्नी केलीय.
तू मला आणि आपल्या लोकांना धोका दिलायस. निरोप घेते, जॉन.

टबमन पुन्हा उत्तर भागात गेली. ती थॉमस गॅरेटच्या घरी थांबली.

इथे खूप लोक आहेत. त्यांना सुरक्षितपणे नेण्यासाठी कुणीतरी नेतृत्व करायला हवं.

मी मदत करेन त्यांना, थॉमस.

आपण नक्की पकडले जाऊ. मला परत जायचंय.

कुणीही परत जायचं नाही. तुमच्याकडे पुढे जायचं किंवा मरण पत्करायचं याशिवाय दुसरा पर्याय नाही.

ज्या गुलामांना हॅरियेट टबमन पळवून नेत असे, ते नेहमी भयग्रस्त असत. अमेरिकेचा दक्षिण भाग ते कॅनडा हा प्रवास दीर्घ आणि कठीण होता. गुलामांनी सुरक्षितपणे पोहोचावे, स्वतंत्र व्हावे यासाठी टबमनने शक्य ते सगळे काही केले.




हॅरियेट टबमन आणि तिच्यासोबत प्रवास करणारे गुलाम भुयारी रेल्वेमार्गात अनेक स्थानकांवर थांबत. यांमध्ये, फिलाडेल्फिया, अल्बानी, रोचेस्टर आणि बफेलो ही काही स्थानके होती.

गुलाम पळून जात होते, त्यामुळे त्यांचे मालक खूप नाराज झाले.






मालकांनी गुलामांना वा त्यांना पळायला मदत करणाऱ्या लोकांना पकडून देणाऱ्यांना बक्षीस जाहीर केले.

त्यांनी टबमनला पकडून देणाऱ्याला 40,000 डॉलरचे बक्षीस जाहीर केले.





तरीही हॅरियेट टबमनने आपले काम सुरूच ठेवले. तिने तर एकदा ट्रेनमधूनही प्रवास केला. कुणी तिला पाहिले असते तर ती नक्कीच पकडली गेली असती.

जॉन ब्राउन हे गुलामगिरी प्रथेचे कट्टर विरोधक होते. ते टबमनला भेटण्यासाठी सेंट कॅथरीनला गेले. ब्राउन यांना टबमनच्या कामाबद्दल अधिक जाणून घ्यायचे होते.



मेरीलँडच्या गुलामांना स्वतंत्र करायला टबमनने तब्बल 10 वर्षे आपला वेळ आणि पैसा खर्च केला. तिने एकोणीसवेळा तिथे प्रवास करून तब्बल 300 गुलामांना मुक्त केले.

गृहयुद्धादरम्यान हॅरियेट टबमनने देशाच्या लष्करासाठी काम केले. तिने मुक्त केलेले अनेक गुलामही लष्करात भर्ती झाले.



युद्धानंतर, टबमनने स्त्रियांच्या हक्कांसाठी काम केले. ती एक लोकप्रिय वक्ता होती.



1913 साली वयाच्या 91 व्या वर्षी मृत्यू होईपर्यंत, हॅरियेट टबमन विविध लोकांच्या हक्कांसाठी लढा देत राहिली.

समाप्त

# कालक्रम

1822 अरामिंटा रॉसचा जन्म मेरीलँडच्या डोर्चेस्टर प्रांतात गुलामाच्या घरी झाला.
1828 अरामिंटा एका विणकराकडे काम करू लागली.
1832 अरामिंटाला गोवर झाला. बरी झाल्यावर ती मोलकरीण आणि आया म्हणून काम करू लागली.
1833 अरामिंटाने आपले नाव बदलून हॅरियेट ठेवले. हॅरियेटला एका सुपरवायझरमुळे इजा झाली.
1844 हॅरियेटने मुक्त असलेल्या जॉन टबमनशी लग्न केले.
1849 हॅरियेट टबमनचे मालक एडवर्ड ब्रोडेसचे निधन झाले. टबमन मुक्त होण्यासाठी पळून फिलाडेल्फियाला गेली. तिथे ती गुलामगिरी प्रथेविरुद्ध असलेल्या विल्यम स्टीलला भेटली.
1850 टबमन भुयारी रेल्वेची एक कंडक्टर बनली. तिने आपली पुतणी आणि तिच्या दोन मुलांना स्वतंत्र केले.
1851 हॅरियेट टबमन, जॉन टबमनला उत्तर भागात नेण्यासाठी डोर्चेस्टर प्रांतात परतली. जॉनने पुनर्विवाह केल्यामुळे तो हॅरियेटसोबत गेला नाही.
1852-1860 टबमनने भुयारी रेल्वेचे काम सुरू ठेवले.
1861 मध्ये टबमनने गृहयुद्धादरम्यान देशाच्या लष्करासाठी काम केले.
1913 हॅरियेट टबमनचे वयाच्या 91 व्या वर्षी निधन झाले.